नये कीं, ब्रह्मज्ञ पुरुषानें वाटेल तो अनाचार करावा, असा त्याला परवाना मिळाला आहे! ईश्वराचे घरीं असा परवाना सुटणें शक्यच नाहीं. असो: हीं वाक्यें ग्रथित करण्याचा उद्देश इतकाच दिसतो कीं, कर्मकांडामध्यें जे वर्णाश्रमाचे नियम सांगितले आहेत, त्या नियमांप्रमाणें परमहंस परिव्राजकाचार्यानें अरण्यांत वा एकांतांत सुद्धां चाललेंच पाहिजे, असें नाहीं. तो वर्णाश्रमांत नसतो म्हणून त्याला वर्णाश्रमाचे नियम लागत नाहींत, किंवा तो समाजांत राहत नसेल तर त्याला समाजाचे नियमही लागूं नयेत. पण वर्णाश्रमांत राहावयाचें, समाजांतही राहावयाचें, पण वर्णाश्रमाचे किंवा समाजाचे नियम पाळावयाचे नाहींत, हें चालावयाचें नाहीं. उघडच आहे, वर्णाश्रमांत व समाजांत राहिल्यानें वर्णाश्रमापासून अथवा समाजापासून होणारे लाभ जर आपल्यास हवे आहेत, तर तेथें राहून त्या त्या संस्थांचे नियमही पाळणें म्हणजे बंधन प्राप्त करून घेणें अत्यंत अवश्य आहे. लाभहानि हीं दोन्हीं ज्याची नष्ट झालीं तो ब्रह्मस्वरूपच झाला; मग त्याला परवानाही नको, किंवा स्वातंत्र्यही नको. त्याच्या शरीराला निग्रहानुग्रह झाला तरी त्याला त्याची क्षिति नसल्यामुळें तो स्वतः बद्ध-मुक्त कांहींच होत नाहीं. एवंच जाणून बुजून अन्याय करण्याचा परवाना ब्रह्मज्ञास मिळत नाहीं व मिळावयाचाही नाहीं.

## सर्व विसंवादी आचार्यांचा सुसंवाद.

आमच्या या आर्यभूमींत वेदांतज्ञानविज्ञानाचा उद्घोष करणारे जे अपौरुषेय ग्रंथ आहेत त्यांत मुख्यतः उपनिषदांचा समावेश होतो, हें सत्य अनेक वेळां सांगण्यांत आलें आहे. जीव, जगत् आणि ईश्वर या त्रयींचें स्वरूप, लक्षण, परस्पर संबंध, जगन्निर्माणाचा हेतु, जीवाचें अंतिम साध्य व त्याचें कर्तव्य, इत्यादि विचार या उपनिषदांत केव्हां स्पष्टपणानें तर केव्हां अस्पष्टपणानें आलेले आहेत. हा अस्पष्टपणा दूर व्हावा आणि उपनिषदांमध्यें केव्हां केव्हां विरोध आहेसा सामान्य वाचकांस भास होऊन त्याचा जो घोंटाळा होतो तो नाहींसा करावा एतदर्थ गीता व ब्रह्मसूत्रें यांचा अवतार झाला. गीतेमध्येंही तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या, बाराव्या, सतराव्या, अठराव्या अध्यायाच्या आरंभीं व तिसऱ्या, सहाव्या, अकराव्या अध्यायांच्या मध्यें अर्जुनाचा घोंटाळा झाला म्हणून त्यानें प्रश्न केले आहेत; ब्रह्मसूत्रांतही अनेक वेळ पूर्वपक्ष उभा करून म्हणजे शंका उद्भूत करून तिचें निवारण केलें आहे. इतका प्रयास श्रीमद्व्यासांनीं केला आहे, तथापि त्याच श्रीमद्भगवद्गीतेचा अर्थ विशद करणारे व सूत्रांची व्यवस्था लावणारे जे भाष्यकार झाले, या उभय ग्रंथांवर व उपनिषदांवर 'विद्वन्मान्य' भाष्यें केलीं म्हणून ज्यांस आचार्य पदवी प्राप्त झाली त्या भाष्यकार आचार्यांमध्यें तरी एकवाक्यता कोठें आहे? 'नानापंथ व नानामतें । झालीं जगीं असंख्यात ॥ आतां कोठें भाव धरूं । देवा चित्त कोठें स्थिरूं ? ॥' असा प्रश्न प्रत्येक विचारी पुरुषांस येतो. त्याचें समाधान स्थूलमानानें

करण्यासाठीं आणि अत्यंत अंतरगांतील एक दोन गोष्टी सोडून दिल्यावर सर्वत्र ऐकमत्य आहे, असें दाखविण्याचा हा माझा प्रयत्न आहे. मागें एका भागांत या ऐकमत्याचें दिग्दर्शन केलें आहे; पण त्यापेक्षां जास्त विस्तारानें व जास्त सुलभ भाषेंत हें विवेचन होईल तर बरें, अशा कांहीं सन्मान्य हितचिंतकांच्या आग्रहपूर्वक सूचना आल्यावरून मी हा प्रयत्न करित आहे. इकडे वाचकांचें सावधान चित्त असावें अशी प्रार्थना करून व प्रो० देसाई, इंदूर कॉलेज यांनीं 'वैदिक तत्त्वसिद्धांत' या किंवा अशा नांवाचा जो एक सुविचार परिप्लुत निबंध लिहिला, त्याचा मला या कामीं फार उपयोग झाला, त्याचप्रमाणें 'गीतासमन्वय' या नांवाचा कलकत्याकडे एक अल्पसा सुंदर ग्रंथ झाला आहे, त्याचाही मी प्रमुक्तमनानें उपयोग करून घेतला, हें सांगून आतां प्रकृत कार्याला आरंभ करितों. येथें निरनिराळ्या आचार्यांच्या मतांचें भाषांतर शब्दशः नाहीं, तात्पर्य समजण्यापुरतें अर्थशः आहे हें समंजस वाचकांस सांगावयास नकोच आहे.

## केवळ कर्माची अनुपयोगिता.

श्रीमच्छंकराचार्यः—

शारीरिक, वाचिक व मानसिक अशीं तीन प्रकारचीं कर्में आहेत. हीं कर्में श्रुतिस्मृतिविहित असतील तर तीं कर्में धर्मपर होतात. 'आतां या नंतर धर्माचा विचार करावयास आरंभ करूं या' असें जैमिनी ऋषींनीं पूर्वमीमांसेचा विषयप्रवेश करितांना प्रथम सूत्रांत म्हटलें आहे. हा धर्मविचार करित असतां त्यांस अधर्माचाही विचार करावा लागला. उघडच आहे कीं 'अधर्म कोणता' हें विचार करून ठरविलें म्हणजे अधर्मात्मक कर्में कोणतीं व त्यांचा त्याग कां व कसा करावयाचा हें समजतें. असो; याप्रमाणें अनर्थ व दुःख उत्पन्न करणारीं अधर्मकृत्यें टाकावयाचीं व इष्टफल म्हणजे सुख उत्पन्न करणारीं धर्मकृत्यें करावयाचीं असें ठरतें. या फलांचा उपभोगही कायावाचामन ह्या करवीं आपण घेतों; म्हणजे ब्रह्मदेवापासून तो सांवापर्यंतचे सर्व चराचर भूतजात घेतात. हा उपभोग कमीजास्ती सुखकारक होतो....असो; याप्रमाणें अज्ञानवश जे लोक (जीव) आहेत त्यांस शरीरादि धारण करणें भाग पडून सुखदुःखांचा कमीजास्तपणा उत्पन्न करणारीं धर्ममूलक अथवा अधर्ममूलक कर्में ह्या जीवांच्या हातून घडतात. श्रुतिही सांगते कीं, 'कर्मसंचयामुळें शरीर धारण करणाऱ्या जीवांला सुखदुःखांचा सहवास कर्मानुसार व्हावयाचाच' (छांदोग्य ८।१२।१). एवंच **केवळ कर्मच जोंपर्यंत घडत** आहे, मग तें कर्म वैदिक असो; वा लौकिक असो,—तोंपर्यंत मोक्षस्वरूप मिळणें अशक्य आहे. (पहा शां. भा. ब्र. सू. अ. १ पाद १ सू. ४) प्रत्येक क्षणाला नाश पावणारें केवळ कर्म, कालांतरानें उत्पन्न होणाऱ्या फलाचें जनक होईल हें म्हणणें योग्य नाहीं. कारण अभावात्मक कारणापासून भावात्मक कार्याची उत्पत्ति होणें अशक्य आहे. तरी पण नाश पावणारें कर्म, स्वतःचें फल उत्पन्न करून मग नाश पावतें व कालांतरानें कर्मकर्ता

त्या फलाचा उपभोग घेतो, असें म्हणावें तर तेंही जुळत नाहीं; कारण फल भोक्त्याचा संबंध उत्पन्न होण्यापूर्वीच फल निर्माण होतें. हें म्हणणें युक्तीस धरून नाहीं. अदृष्ट फल उत्पन्न होतें तें अचेतन असतें म्हणून त्याच्या एकट्याच्या हातून कांहीं होणें शक्यच नाहीं. (पहा शां. भा. ब्र. सू. अ. ३ पा. २ सू. ३८). उदाहरणार्थ 'स्वर्गकामोयजेत' हा विधि घेतला तर कर्म होतें, तें पाहूं. यज्ञ कर्म संपल्यानंतर काळानें स्वर्ग मिळतो अशी सरणी आहे. पण संपलेलें जें कर्म तें स्वतः देहपातानंतर मिळणारा स्वर्ग कसा उत्पन्न करील? उत्पन्न करणें शक्यच नाहीं. आतां यज्ञ केला असतां कांहीं एक फल उत्पन्न होतें व देहपातानंतर तें फल स्वर्ग देतें असें ह्मणावें तर देहपातानंतर स्वर्ग मिळविणाऱ्या पुरुषाचा संबंध सद्यःकालीं फल उत्पन्न करणाऱ्या कर्माशीं कसा जुळणार? हेंही जुळत नाहीं. बरें अदृष्ट उत्पन्न होतें, असें ह्मणावें, तर तें बिचारें अचेतन आहे. कोणी तरी योजक असल्याशिवाय नुसतें कर्म, किंवा कर्मफल किंवा अदृष्ट कांहीं एक करूं शकत नाहीं. मग मोक्षाची गोष्ट लांबच राहिली.

श्रीमद्रामानुजाचार्यः—

कठोपनिषदाच्या पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या वल्लींत २३ व्या मंत्रांत असें ह्मटलें आहे कीं, 'वेदाचें पुष्कळसें प्रवचन करून, पुष्कळसा बुद्धिपूर्वक विचार करून, किंवा जन्मभर श्रवण करून, आत्मस्वरूपाचा लाभ व्हावयाचा नाहीं.' सारांश नुसत्या श्रवण-मनन-निदिध्यासानें ब्रह्मपदाची प्राप्ति होणार नाहीं....नुसतीं विहित कर्में जरी केलीं तरी मोक्षप्राप्ति होणार नाहीं. कारण सत्कर्म केलें तरी 'मी हें कर्म केलें' हा अभिमान व 'मला ह्या कर्माचें फल मिळालें पाहिजे' ही वासना हीं उभयतां ज्ञानविरोधी आहेत व तीं स्वरूपज्ञान होण्याच्या मार्गांत येतात; म्हणजे मोक्षज्ञान उत्पन्न होऊं देत नाहींत....श्रुतिही असेंच सांगते कीं, चातुर्मास्य यागादिकांचें फल स्वभावतः संकुचित आणि कालभंगुर असतें. या फलाच्या योगानें सर्वव्यापि व त्रिकालाबाधित जें ब्रह्म त्याचा लाभ होणें शक्य नाहीं. (रामा. भा. ब्र. सू. अ. १ पाद. १ सू. १.) याचप्रमाणें या आचार्यांचें तिसरा अध्याय, पाद ४ मधील प्रथम प्रथम सूत्रांवरील भाष्य वाचिलें असतां व याच अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील शेवटचीं सूत्रें घेतलीं असतां किंवा 'किं प्रजया करिष्यामो वेदानुवचनेन वा' या श्रुतिमंत्रावरील स्पष्टीकरण पाहिलें असतां कोणासही हें कळल्यावांचून राहणार नाहीं कीं 'केवळ कर्मानें मोक्ष प्राप्त होणें शक्य नाहीं,' असेंच यांचें मत आहे.

श्रीमध्वाचार्यः—

हे जे सर्व लोक ह्मणजे निरनिराळीं निवास-स्थानें आहेत, या सर्वांचा निरीक्षणपूर्वक विचार केला असतां या उपभोग-स्थितीसंबंधानें वैराग्यच उत्पन्न होतें. 'जें स्वयंभू आहे व विकारशून्य असून नित्य आहे, तें उत्पन्न झालेल्या ह्मणजे